**अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून विद्यमान संस्थेत नवीन अभ्यासक्रम कायम विनाअनुदानित तत्वावर सुरु करण्यास शासन मान्यता देण्याबाबत...**

---

**श्री.चाणक्य एज्युकेशन सोसायटीचे इंदिरा कॉलेज ऑफ फार्मसी, ताथवडे, पुणे**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.मान्यता-२०२४/प्र.क्र.१४६/तांशि-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा चौक राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०८ ऑगस्ट, २०२४.

**वाचा** : १) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र एफ.क्र.वेस्टर्न/२०२४-२५/१-४३८९५६३८६०८. दि.निरंक.
२) संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र.२/एनजीसी/नवीन संस्था मान्यता/MBA/२०२४/४६१, दि.०९.०७.२०२४.
३) संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र.२/एनजीसी/२०२४/५१०, दि.२०.०७.२०२४.

**प्रस्तावना :** अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी उपरोक्त वाचा क्र.१ येथील पत्रान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन, संचालक, तंत्रशिक्षण यांनी वाचा क्र.२ व ३ येथील रोजींच्या पत्रान्वये, श्री.चाणक्य एज्युकेशन सोसायटीचे इंदिरा कॉलेज ऑफ फार्मसी, ताथवडे, पुणे या विद्यमान विनाअनुदानित संस्थेत शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून एमबीए हा पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम ६० प्रवेश क्षमतेसह सुरु करण्यास शासन मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार उक्त अभ्यासक्रमास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरून, श्री.चाणक्य एज्युकेशन सोसायटीचे इंदिरा कॉलेज ऑफ फार्मसी, ताथवडे, पुणे या विद्यमान विनाअनुदानित संस्थेत शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून एमबीए हा पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम ६० प्रवेश क्षमतेसह सुरु करण्यास कायम विनाअनुदानित तत्वावर, प्रचलित अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.:-

**अटी व शर्ती:-**

१) सदर मान्यता कायम विनाअनुदान तत्वावर राहील.

२) प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दि.२१ मे, १९८३ च्या शासन निर्णयातील अटींची पूर्तता करणे, महाविद्यालयावर बंधनकारक राहील.

३) शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत महाविद्यालयाने संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई यांच्याशी करारनामा करावा लागेल. तसेच, महाविद्यालयाने आवश्यक कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्र शिक्षण यांच्या संमतीने समाधानकारकरित्या पूर्ण करावी.

४) संबंधित महाविद्यालयाने, संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचित ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

५) सदर अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार / पद्धतीनुसार करण्यात येतील.

६) शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क महाविद्यालयाने आकारल्यास, महाविद्यालयावर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्युशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

७) महाविद्यालयाने अभ्यासक्रम चालविण्याकरिता शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली व संबंधित विद्यापीठाच्या मानकानुसार नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच, शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इ. बाबत तसेच, विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास महाविद्यालयावर कडक कारवाई करण्यात येईल.

८) महाविद्यालयाने ग्रंथालयाकरिता आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक राहील. तसेच, विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच, विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

९) रॅगिंगसंदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे महाविद्यालयांवर बंधनकारक राहील.

१०) महाविद्यालयाने सदर अभ्यासक्रम चालविण्यासाठी आवश्यक स्थावर जंगम मालमत्तेकरिता शासनाकडून किंवा कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेतले असल्याचे निदर्शनास आल्यास त्यांची परतफेड करण्याची सर्वस्वी जबाबदारी महाविद्यालयाची राहील.

११) शासन निर्णय दि.२२.०२.२०१८ अन्वये विहित केलेले नोंदणी शुल्क संबंधित महाविद्यालय / संस्थेने भरणा केले नसेल, तर ते सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, पुणे यांनी संबंधित महाविद्यालय / संस्थेकडून भरणा करुन घ्यावे.

१२) महाविद्यालयाने संबंधित विद्यापीठाचे संलग्निकरण प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील.

२. याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती महाविद्यालयावर बंधनकारक राहतील.

३. या शासन मान्यतेनुसार उक्त संस्था/महाविद्यालयातील अभ्यासक्रमांचा केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेमध्ये समावेश होण्याकरिता संचालक, तंत्र शिक्षण यांनी आवश्यक ते आदेश निर्गमित करावेत.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०८१८३३०६२८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAHAJAHAN SHAKUR MULANI

Digitally signed by SHAHAJAHAN SHAKUR MULANI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=d203fe3b025c07c7692f5c23a43a4905f46cdde0ef54f3944caf1c620a5bc64e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BF4EB2A0C007D6CA5A25B0E564499E5FF904468E1A96902315E3E67299424039, cn=SHAHAJAHAN SHAKUR MULANI
Date: 2024.08.08 18:47:50 +05'30'

**(शहाजहान मुलाणी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, पुणे (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत).
४) कुलसचिव, संबंधित विद्यापीठ (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
५) संबंधित महाविद्यालय (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
६) निवडनस्ती/तांशि-४